**सहायक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या व पदस्थापनांबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राजस-१२१५ /प्र.क्र.१९ /१२-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३१ जानेवारी, २०१५

वाचा :-

१) **शासन निर्णय क्रमांकः राजस-२०१४/शिकाना/प्र.क्र.१६/१२-स, दि.२० डिसेंबर, २०१४**
२) **मा.प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे दि.२३.०१.२०१५ चे आदेश**

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सहकार विभागातील सहायक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब या संवर्गातील श्री.एस.एम.मोहिते, सहायक निबंधक, सहकारी संस्था, एस विभाग, मुंबई यांची बदली प्रशासकीय कारणास्तव सहायक निबंधक, सहकारी संस्था, विक्रमगड, जि.ठाणे या रिक्त पदी करण्यात आलेली होती. सदरहू दि.२०.१२.२०१४ च्या बदलीच्या आदेशास श्री.मोहिते यांनी मा.प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्रमांक १०७५/२०१४ अन्वये आव्हानीत केले होते. मा.न्यायाधिकरणाने दि.२३.०१.२०१५ रोजी पारित केलेल्या आदेशानुसार उपरोक्त दि.२०.१२.२०१४ च्या आदेशात अंशत: बदल करुन श्री.एस.एम.मोहिते, सहायक निबंधक यांची बदली सहायक निबंधक, सहकारी संस्था (दुग्ध), अलिबाग, जि. रायगड अधिनस्त जिल्हा दुग्ध विकास अधिकारी कार्यालय अलिबाग, जि.रायगड, वर्ग-२ या रिक्त पदी करण्यात येत आहे.

२. श्री.मोहिते यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरित हजर होवून त्याबाबतचा अहवाल सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

३. सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील असे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी कृपया पहावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१३११२४५४६४४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Muloo Dhadwe

Digitally signed by Suresh Muloo Dhadwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Muloo Dhadwe
Date: 2015.01.31 12:54:48 +05'30'

**(सु.मु.धाडवे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, कोकण विभाग
३. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, मुंबई, ठाणे, रायगड
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, रायगड
६. संबंधीत अधिकारी द्वारा-सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,म.रा.,पुणे
७. निवड नस्ती.